आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्या आस्थपनेवरील उपायुक्त समाज कल्याण, गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सन २०१७ मधील नियमित बदल्या

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन आदेश क्रमांकः सकआ - २०१७/प्र.क्र. १५२/ आस्था-२
मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक
मादाम कामा मार्ग, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ३१ मे, २०१७

## आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या नियम - ४ मधील तरतुदीनुसार समाज कल्याण आयुक्तालयाच्या आस्थापनेवर कार्यरत असलेल्या उपायुक्त समाजकल्याण व तत्सम गट अ संवर्गातील खालील अधिकाऱ्यांच्या प्रशासकीय कारणास्तव बदल्या करण्यात येत असुन, त्यांच्या नावासमोरील स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविलेल्या ठिकाणी त्यांची बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नांव, पदनाम | सध्या कार्यरत ठिकाण | बदलीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.बी. डी. खंडाते | उपायुक्त तथा सदस्य, जि.जा.प्र.प., अमरावती | उपसंचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे या रिक्त पदावर |
| २ | श्री.डी. डी. देशमुख | प्राध्यापक यशदा, पुणे | उपसंचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण संचालनालय, पुणे या रिक्त पदावर |
| ३ | श्री पी. एस. कवटे | उपायुक्त तथा सदस्य जि.जा.प्र.प., लातूर | प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, पुणे या रिक्त पदावर |
| ४ | श्री. वाय एस. मोरे | प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, मुंबई | उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, पालघर या रिक्त पदावर |
| ५ | श्री.अरविंद वळवी | उपायुक्त तथा सदस्य, जिजाप्रप मुंबई उपनगर | सध्याच्या पदावर १ वर्ष मुदतवाढ देण्यात येत आहे. |
| ६ | श्री.राजेंद्र कलाल | उपायुक्त तथा सदस्य, जिजाप्रप नाशिक | प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, नाशिक या श्री.गवळे यांच्या सेवानिवृत्तीने रिक्त होणाऱ्या पदावर |

२. श्री. वाय एस. मोरे यांच्याकडे प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण, मुंबई या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात येत आहे.

श्रीमती वंदना कोचुरे, उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, परभणी यांच्याकडे श्री.राजेंद्र कलाल, उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, नाशिक यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात येत आहे.

श्री.बी.डी.खंडाते, उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, अमरावती यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार श्री.वडकुते, प्रादेशिक उपायूक्त, अमरावती यांच्याकडे सोपविण्यात येत आहे.

श्री.कवटे, उपायुक्त तथा सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती, लातूर यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार श्री.वाघमारे, प्रादेशिक उपायूक्त,लातूर यांच्याकडे सोपविण्यात येत आहे.

उपरोक्त अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांच्याकडील मुळ पदाचा कार्यभार सांभाळून त्यांच्याकडे सोपविण्यात आलेल्या अतिरिक्त पदाचा कार्यभार सांभाळावा.

३. बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ व कार्यक्षमरित्या होण्याकरिता खालील सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे -

१. बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर आयुक्त समाज कल्याण, पुणे यांनी बदली झालेल्या अधिकाऱ्यास बदली झालेल्या पदावर रुजु होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे.

२. बदली झालेला अधिकारी संबंधित कार्यालयातून कार्यमुक्त होऊन रुजू होण्यासाठी आल्यावर त्यांना विनाविलंब रुजू करुन घ्यावे. एखाद्या अधिकाऱ्यास रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतीक्षा काळ ठरवून काम न देता वेतन व भत्ते देण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित आस्थापना अधिकाऱ्यांस जबाबदार धरण्यात येईल.

३. बदली आदेशात बदल करुन घेण्यासाठी संबंधित अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंग विषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५३११५४६२८०५२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Siddharth
Amrutrao Zalte

Digitally signed by Siddharth Amrutrao Zalte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice and Special Assistance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=dc54b49c6f5c903027053476b3a6ef50b46ff44a7e8b820fef7bfdd100c56194, cn=Siddharth Amrutrao Zalte
Date: 2017.06.02 15:06:38 +05'30'

**(सिद्धार्थ अ. झाल्टे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

सर्व संबंधित अधिकारी (आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांच्यामार्फत)

**प्रत,**

१) आयुक्त, समाज कल्याण, पुणे
२) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे
३) संचालक, विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण
४) महासंचालक, डॉ.बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण , संस्था पुणे
५) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण,
६) सर्व अध्यक्ष/सदस्य, जिल्हा जात प्रमाणपत्र पडताळणी समिती
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१/२, मुंबई/नागपूर
८) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी/ अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
९) मा.मंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
१०) मा.राज्यमंत्री (सा.न्या. व वि.स.) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
११) सचिव (सा. न्या. व वि. स. विभाग) यांचे वरिष्ठ स्वीय सहाय्यक मंत्रालय मुंबई
१२) निवडनस्ती आस्था-२